अपंग व्यक्ती (समानसंधी, संपूर्ण सहभाग व हक्कांचे संरक्षण) अधिनियम, १९९५ अनुसार केंद्र शासनाने अपंगांच्या नियुक्तीसाठी योग्य ठरविलेल्या पदांच्या सूचीनुसार सार्वजनिक बांधकाम विभागातील गट-अ, ब, क व गट-ड मधील सुयोग्य पदे निश्चित करणेबाबत.

महाराष्ट्र शासन
सार्वजनिक बांधकाम विभाग
शासन निर्णय, क्र.अपंग २०१०/प्र.क्र.३७५/सेवा-४
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२
दिनांक : ११ जानेवारी, २०११

वाचा:- १) अपंग व्यक्ती (समान संधी, संपूर्ण सहभाग व हक्कांचे संरक्षण) अधिनियम, १९९५ (१९९६ चा-१)
२) शासन परिपत्रक, सामान्य प्रशासन विभाग, क्र. एसआरव्ही १०९८/प्र.क्र.१२/९७/१६-अ, दिनांक २ मे, १९९८
३) शासन निर्णय, सार्वजनिक बांधकाम विभाग, क्र. अपंग २००५/प्र.क्र.१३७/सेवा-४, दिनांक ६ सप्टेंबर, २००५.
४) शासन निर्णय, सार्वजनिक बांधकाम विभाग, क्र. क्र.अपंग २००५/प्र.क्र.१०२/सेवा-३, दिनांक ३ ऑक्टोबर, २००५.
५) शासन निर्णय, सार्वजनिक बांधकाम विभाग, क्र.अपंग २००४/प्र.क्र.३३२/सेवा-३, दिनांक १९ जुलै, २००८.
६) केंद्र शासनाची अधिसूचना क्र. १६-७०/२००४- डी-डी-तीन, दिनांक १५ मार्च,२००७
७) शासन निर्णय, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य, क्र.न्यायाप्र-२००९/प्र.क्र.५/सुधार- ३ दिनांक ०३ ऑगस्ट, २०१०.

प्रस्तावना :-

अपंग व्यक्ती (समान संधी, संपूर्ण सहभाग व हक्कांचे संरक्षण) अधिनियम, १९९५ हा अधिनियम दि. ७ फेब्रुवारी १९९६ पासून अंमलात आलेला आहे. या अधिनियमात अपंगांच्या सर्वांगिण विकासासाठी व त्यांना सामाजिक सुरक्षा प्रदान करण्यासाठी शासकीय सेवेत ३ टक्के पदे आरक्षित करण्याची तरतूद करण्यात आलेली आहे. सदर तरतुदीनुसार सार्वजनिक बांधकाम विभागातील गट-अ ते गट-ड मधील पदावर अपंग व्यक्तीच्या नेमणुकीसाठी पदांची निश्चिती करण्याबाबत उपरोक्त क्र. ३, ४ व ५ येथील शासन निर्णयान्वये यापूर्वी आदेश निर्गमित करण्यात आलेले आहेत. अपंग व्यक्तीसाठी सुधारित पदनिश्चिती करणे व त्या अनुषंगाने अपंगांची राखीव पदे भरणे यासंदर्भात मुंबई उच्च न्यायालयात जनहित याचिका क्र.२२५/२००९ दाखल झालेली असून सदर याचिकेच्या सुनावणीच्या वेळी शासनाच्या विविध विभागामध्ये अपंगासाठी राखीव ठेवण्यात आलेल्या पदांच्या पदनिश्चितीमध्ये एकवाक्यता नाही किंवा ती परिपूर्ण नाही या कारणास्तव, मा. उच्च न्यायालयाने केंद्र शासनाच्या मार्गदर्शक सूचनांनुसार अपंगासाठी सुयोग्य पदनिश्चिती करण्याचे आदेश दिले आहेत. त्यास अनुसरुन उपरोक्त क्र. ७ येथील दि. ३ ऑगस्ट,२०१० च्या शासन निर्णयान्वये सामाजिक न्याय व विशेष सहाय्य

विभागाने दिलेल्या सूचनांनुसार, केंद्र शासनाच्या मार्गदर्शक सूचना व केंद्रशासनाने अपंगाच्या नियुक्तीसाठी योग्य ठरविलेल्या पदांची सूची विचारात घेऊन सार्वजनिक बांधकाम विभागातील सुयोग्य पदे निश्चित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णय :-

प्रस्तावनेतील वरील बाबी विचारात घेऊन उपरोक्त संदर्भाधीन क्र. ३, ४ व ५ येथील शासन निर्णय अधिक्रमित करुन पुढीलप्रमाणे सुधारित आदेश देण्यात येत आहेत. :-

केंद्र शासनाने उपरोक्त संदर्भाधीन क्र. ६ येथील दिनांक १५ मार्च,२००७ च्या अधिसूचनेन्वये, शासन सेवेत अपंगांच्या नियुक्तीसाठी, प्रत्येक पदाची कर्तव्ये व जबाबदाऱ्या विचारात घेऊन अपंगांच्या वर्गवारीनुसार सुयोग्य पदांची सूची प्रसिध्द केलेली आहे. केंद्र शासनाच्या मार्गदर्शक सूचना विचारात घेऊन व पदांच्या सूचीचे अवलोकन करुन सार्वजनिक बांधकाम विभागातील गट-अ ते गट-ड मधील जी समान पदे आहेत ती पदे अपंगाच्या सरळसेवा भरतीसाठी या आदेशान्वये निश्चित करण्यात येत आहेत. सदर पदांची यादी व त्या पदासाठी योग्य अपंगाची वर्गवारी याची माहिती सोबतच्या परिशिष्टामध्ये दिली आहे. त्यानुसार परिशिष्टामध्ये नमूद केलेल्या सार्वजनिक बांधकाम विभागातील पदांवर यापुढे अधिनियमातील तरतुदी विचारात घेऊन व वेळोवळी निर्गमित केलेले आदेश विचारात घेऊन, अपंग व्यक्तींची नेमणूक करण्याची कार्यवाही करण्यात यावी.

२. अपंग व्यक्तींच्या नियुक्तीसाठी अपंग व्यक्ती (समान संधी, संपूर्ण सहभाग व हक्कांचे संरक्षण) अधिनियमातील तरतुदीनुसार पुढीलप्रमाणे कार्यवाही करण्यात यावी.

(१) अपंग व्यक्ती (समान संधी, संपूर्ण सहभाग व हक्कांचे संरक्षण) अधिनियम १९९५, (१९९६ चा-१) या अधिनियमातील कलम ३२ व ३३ नुसार सार्वजनिक बांधकाम विभागांतर्गत गट -अ, गट-ब, गट -क, व गट- ड मधील विविध संवर्गातील पदांवर अपंगत्वाचे प्रमाण किमान ४० टक्के असलेल्या अपंग व्यक्तींना ३ टक्के पर्यंत फक्त सरळसेवा भरतीमध्ये आरक्षण ठेवण्यात यावे.

(२) संबंधिताकडून उमेदवारांची शिफारस प्राप्त झाल्यावर अशा उमेदवारांस शारिरीक पात्रतेसंबंधात विहित केलेल्या वैद्यकिय मंडळाने प्रस्तावित केल्यानंतरच अशा अपंग व्यक्तींची सार्वजनिक बांधकाम विभागांतर्गत सेवेत गट -अ, गट-ब, गट -क, व गट- ड मधील पदावर नियुक्ती करण्यात यावी. याशिवाय खालील निकषानुसार अशा अपंग व्यक्तींची सरळसेवा भरतीने नियुक्ती करण्यात यावी.

अ) संबंधित सेवाप्रवेश नियमाच्या तरतूदीनुसार आवश्यक अर्हता असेल तर

ब) त्या त्या संवर्गातील पदांची कर्तव्ये व जबाबदाऱ्या लक्षात घेऊन त्याप्रमाणे वैद्यकीय मंडळाने पदासाठी सक्षम ठरविल्यास,

क) सार्वजनिक बांधकाम विभागांतर्गत गट "अ" "ब" "क" व "ड" मधील विविध संवर्गात सोबतच्या परिशिष्टामध्ये दर्शविल्यानुसार अपंगत्वाच्या प्रत्येक प्रकारास प्रत्येकी १% या प्रमाणे एकूण ३% पर्यंत सरळ सेवा भरतीने आरक्षण ठेवून नियुक्ती करण्यात यावी.

ड) ज्या पदांच्या जबाबदाऱ्या व कर्तव्ये अंध व्यक्तींना पार पडणे शक्य आहे अशा पदांसाठी आवश्यक असणारे सहायक तंत्रज्ञान संबंधित कार्यालयाने उपलब्ध करुन द्यावे व निवड झालेल्या अशा अंध कर्मचाऱ्यांना शासनाच्या सर्वसाधारण धोरणानुसार नियुक्तीचा परिविक्षा कालावधी लागू राहील.

(३) महाराष्ट्र लोकसेवा आयोगामार्फत राजपत्रित गट "अ" व "ब" तसेच इतर मार्गाने क्षेत्रिय कार्यालयांकडून भरण्यात येणारी अराजपत्रित गट "ब", गट "क" व "ड" गटासाठी सरळसेवा भरतीने भरावयाच्या पदांसाठी अपंगांची वर्गवारी याचा तपशील सोबतच्या परिशिष्टामध्ये दिलेला आहे. त्या निकषांवर अशा अपंग व्यक्तीची सरळसेवा भरतीने नियुक्ती करण्यात यावी.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर प्रसिध्द करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक क्र. २०११०१११२०४९९४०००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने.

(बी.डी. देशमुख )
उप सचिव, महाराष्ट्र शासन.

प्रति :

मा. राज्यपाल यांचे सचिव
मा.मुख्यमंत्री यांचे सचिव
मा. उपमुख्यमंत्री यांचे सचिव
मा.मंत्री (सा.बां.) यांचे खाजगी सचिव
मा.मंत्री सा.बां. (सा.उ) यांचे खाजगी सचिव
मा. राज्यमंत्री (सा.बां.) यांचे खाजगी सचिव
सचिव, सामान्य प्रशासन विभाग
सचिव, सार्वजनिक बांधकाम विभाग
सचिव, वित्त विभाग
सचिव, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, मंत्रालय, मुंबई
व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य रस्ते विकास महामंडळ, मुंबई
सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई (*पत्राने)
महालेखापाल-१ (लेखा व अनुज्ञेयता / लेखा परीक्षा), मुंबई
महालेखापाल-१ (लेखा व अनुज्ञेयता / लेखा परीक्षा), नागपूर
सर्व मुख्य अभियंते, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग
मुख्य वास्तुशास्त्रज्ञ, मुंबई
मुख्य अभियंता (विद्युत), सा.बां. विभाग, चेंबूर, मुंबई
सर्व सह सचिव/उप सचिव/ अवर सचिव, सा.बां. विभाग
सर्व अधीक्षक अभियंते, सार्वजनिक बांधकाम मंडळ
सर्व कार्यकारी अभियंते, सार्वजनिक बांधकाम विभाग
संचालक, उद्यान व उपवने, मुंबई
संचालक, बी.डी.डी. चाळी, मुंबई
सा.बां.विभागातील सर्व कार्यासने
निवड नस्ती, (कार्यासन सेवा-४) सा.बां. विभाग

(शासन निर्णय, सार्वजनिक बांधकाम विभाग, अपंग २०१०/प्र.क्र. ३७५/सेवा-४, दि.: ११ जानेवारी, २०११ चे सहपत्र )

## परिशिष्ट

### सार्वजनिक बांधकाम विभागांतर्गत गट 'अ' ते 'ड' मधील पदांवर सरळसेवेने अपंगांच्या नियुक्तीसाठी निश्चित केलेल्या पदांची यादी.

| अ.क्र. | पदाचे नाव | पदासाठी योग्य अपंगाची वर्गवारी |
|---|---|---|
| १ | सहाय्यक अभियंता (स्थापत्य) श्रेणी-१ | OL. OA. HH. |
| २ | वरिष्ठ वास्तुशास्त्रज्ञ | OL. HH |
| ३ | वास्तुशास्त्रज्ञ | OL. HH |
| ४ | सहाय्यक अभियंता (विद्युत) श्रेणी-१ | OL. HH |
| ५ | सहाय्यक अभियंता (स्थापत्य) श्रेणी-२ | OL. OA. HH |
| ६ | सहाय्यक अभियंता (विद्युत) श्रेणी-२ | OL. HH |
| ७ | सहाय्यक अभियंता (यांत्रिकी) श्रेणी-२ | OL |
| ८ | कनिष्ठ अभियंता (स्थापत्य) | OL. OA. HH. |
| ९ | कनिष्ठ अभियंता (विद्युत) | OL. HH |
| १० | कनिष्ठ अभियंता (यांत्रिकी) | OL |
| ११ | लघुलेखक उच्चश्रेणी | B/ LV |
| १२ | कनिष्ठ वास्तुशास्त्रज्ञ | OL. HH |
| १३ | वरिष्ठ लिपिक | OA, OL, BL, OAL, BLV, HH |
| १४ | कनिष्ठ लिपिक | OA. OL. BL. OAL. BLV. HH |
| १५ | लघुलेखक निम्नश्रेणी | B/ LV |
| १६ | लघुटंकलेखक | OA. OL. BL. OAL. BLV. HH |
| १७ | वास्तुशास्त्रीय आरेखक | OL. HH |
| १८ | अनुरेखक | OL. BL. LV |
| १९ | संगणक | OA. OL. OAL. BL. BLV. HH |
| २० | सहाय्यक भांडारपाल | OA. OL. HH. |
| २१ | दूरध्वनी चालक | OA. OL. BL. BLV |
| २२ | सहाय्यक वातानुकूल चालक | OL. LV. HH |
| २३ | शिपाई | OL.HH. LVB |
| २४ | मजूर | OA. BL. OL. LVB |
| २५ | चौकीदार | OL.BL. HH |

**ABBREVATIONS USED :-**

OH - orthopaedically handicapped
BLA- both legs & arms
OL - one leg
BA - both arms
OA - one arms
OAL- one arm and one leg
BL - both leg
B - blind
LV - low vision
HH - hearing handicapped

-------X------